**अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०२४/प्र.क्र.२८/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०८ एप्रिल,२०२४.

**संदर्भ :** १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०२३/प्र.क्र.९३/प्रशासन-१ दि.११ ऑक्टोबर, २०२३.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१ फेब्रुवारी, २०२४.
३) अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांचे दि. ३० जानेवारी, २०२४ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय -:**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अस्थायी पदे दि. ०१ सप्टेंबर, २०२३ ते दि. २९ फेब्रुवारी, २०२४ पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील **नियमित अस्थायी आस्थापनेवरील ३६ पदे सोबत दर्शविलेल्या विवरणपत्रानुसार सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून दिनांक ०१ मार्च, २०२४ पासून दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत** चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

३. दि. १० ऑक्टोबर,२०२३ च्या शासन निर्णयान्वये ३४ संवर्गाच्या आतील पदांचा आणि दि. २२ फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये ३४ संवर्गाच्या पुढील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर या शासन निर्णयातील तरतूदी/सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), कोकण भवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयातील एक शिपाई पदासाठी वेतनावरील खर्च " ३०५१ बंदरे व दिपगृहे ०२,लहान बंदरे १०२, बंदर व्यवस्थापन (०१), वेतन (०३), प्रवास खर्च (०५), कार्यालयीन खर्च मागणी क्र.४ " या लेखाशीर्षाखाली असून, उर्वरित अस्थायी पदांकरिता " २०५९ सा.बां. ८० सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन दोन संकल्पचित्र (०१) वेतन (०३), प्रवास

खर्च (०५), कार्यालयीन खर्च (योजनेतर) मागणी क्र. एच-६ संगणक क्र. २०५९०६२३ ” लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**५.** वित्त विभाग, शासन निर्णय क्र.: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. २१ फेब्रुवारी, २०२४ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०८१११८२२०७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDEEP SAHADEO REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.04.08 11:30:07 +05'30'

**( सुदीप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,** १) अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), कोकण भवन, नवी मुंबई.

**प्रत :-** १) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) महालेखापाल-२ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) जिल्हा कोषागार / उप कोषागार अधिकारी, नवी मुंबई / पुणे / नाशिक /छत्रपती संभाजीनगर/नागपूर

४) वित्त विभाग (व्यय-११) / (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.

५) कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) निवडनस्ती

## विवरणपत्र (१) नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे ( ३४ संवर्गाच्या आतील)

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | दि.२९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांची संख्या. | दि.२९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली वाढ. | दि.२९/०२/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांमध्ये झालेली घट | दि.०१/०३/२०२४ पासून दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ द्यावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई | ३६ | ० | ० | ३६ |
| | **एकूण** | **३६** | **०** | **०** | **३६** |